**केंद्रीय गुन्हे अन्वेषण (सी.बी.आय.) यांनी दाखल केलेली प्रकरणे त्वरेने निकाली काढण्यासाठी मुंबई व नागपूर येथील प्रत्येकी १ विशेष न्यायालय अनुक्रमे ठाणे व छत्रपती संभाजीनगर येथे स्थानांतरित करण्याबाबत.....**

# महाराष्ट्र शासन

## विधी व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांकः विशेन्या-१३२४/प्र.क्र.१३७/नऊ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १६ एप्रिल, २०२५.

**संदर्भ-**

१) शासन निर्णय क्रमांक : CRC-१०९८/७५०/६०/नऊ दि. २२.१०.२००७.
२) शासन निर्णय क्रमांक : विधि व न्याय विभाग, सीआरसी१००९/प्र.क्र.८०/नऊ दि.१६.११.२०१०
३) शासन निर्णय क्रमांक : विधि व न्याय विभाग, विशेन्या-१३१३/प्र.क्र.६४/नऊ दि.२.०५.२०१३ व समक्रमांकाचे शुध्दीपत्रक दि.१२.०७.२०१३
४) केंद्रीय गुन्हे अन्वेषण, मुंबई यांचे पत्र क्र. २३७/Re-organization of courts/CBI/Mum Zone /२०२४ दि. ०२.०९.२०२४ व क्र. २९२/Re-organization of courts/CBI/Mum Zone /२०२४ दि. ०४.११.२०२४.
५) मा.उच्च न्यायालयाचे क्र.B(W)A-१२१३ of २०१०/१३४/२६५० दि.१६.०१.२०२५, व क्र. B(W)A-१२१३ of २०१०/२०२/५२०१ दि. २९.०१.२०२५ आणि B(W)A-१२१३ of २०१०/ ७७१/१६११९ दि. २८.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. १ ते ३ येथील शासन निर्णयांन्वये महाराष्ट्रात मुंबई (७), नागपूर(३), पुणे(१) आणि अमरावती (१) या ठिकाणी एकूण १२ केंद्रीय गुन्हे अन्वेषण (सी.बी.आय.) यांनी दाखल केलेली प्रकरणे त्वरेने निकाली काढण्यासाठी विशेष न्यायालये स्थापन करण्यात आली आहेत. केंद्रीय गुन्हे अन्वेषण, मुंबई विभाग यांच्या संदर्भ क्र.४ येथील पत्रांच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयाने संदर्भ क्र. ५ येथील पत्रांन्वये सादर केलेल्या अहवालानुसार सद्यस्थितीत अस्तित्वात असलेल्या सी.बी.आय. न्यायालयांचे कार्यक्षेत्र वाढविण्याबाबत प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यास अनुसरुन ठाणे व छत्रपती संभाजीनगर विभागातील प्रलंबित खटल्यांची संख्या विचारात घेता, सदर खटले निकाली काढण्यासाठी सध्या अस्तित्वात असलेल्या मुंबई आणि नागपूर येथील प्रत्येकी एक विशेष न्यायालय अनुक्रमे ठाणे आणि छत्रपती संभाजीनगर येथे स्थानांतरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भ क्र.२ व ३ येथील शासन निर्णयान्वये मुंबई व नागपूर येथे स्थापन करण्यात आलेल्या विशेष सी.बी.आय न्यायालयांपैकी नगर सत्र न्यायालय, मुंबई येथील कोर्ट नं.४७ हे जिल्हा सत्र न्यायालय, ठाणे येथे तसेच विशेष न्यायालय-३, नागपूर हे जिल्हा सत्र न्यायालय, छत्रपती संभाजीनगर येथे स्थानांतरित करण्यास या व्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरिता नगर सत्र न्यायालय, मुंबई येथील कोर्ट नं.४७ व विशेष न्यायालय-३, नागपूर या न्यायालयातील प्रत्येकी ५ नियमित पदे व १ वाहनचालकाच्या बाह्ययंत्रणेव्दारे घ्यावयाच्या सेवा अनुक्रमे जिल्हा सत्र न्यायालय, ठाणे तसेच जिल्हा सत्र न्यायालय, छत्रपती संभाजीनगर येथे वर्ग करण्यात येत आहेत.

३. वर नमुद केलेल्या नगर सत्र न्यायालय, मुंबई येथील कोर्ट नं.४७ व विशेष न्यायालय-३, नागपूर येथील १० पदांना विभागाच्या क्र.विशेन्या-१३२३/प्र.क्र.२१/का.९ दि.१० मार्च, २०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि. ३१ ऑगस्ट, २०२५ पर्यन्त मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर अस्थायी पदांना दि. ३१ ऑगस्ट, २०२५ नंतर पुढील मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

४. उपरोक्त न्यायालयांकरिता येणारा खर्च मागणी क्रमांक "जे-१, २०१४-न्यायदान (दत्तमत), १०५-दिवाणी व सत्र न्यायालये, (०६) (०१) केंद्रीय गुन्हे अन्वेषण (सी.बी.आय.) विशेष न्यायालय (२०१४०४६८)" या लेखाशीर्षाखालील तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४१६१४५३१९७५१२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढ़ण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHILPA DILIP GAIKWAD

Digitally signed by SHILPA DILIP GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Law and Judiciary Department, 2.5.4.20=087014bd7de0d3d28bc50a76e6183c9a63857b3391f4b1f66149b3ed7bf84ef2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=e366bed26d5b71bce1df85a689815924b8cc3d6a61e23fdc7aecad83968ce1f3, cn=SHILPA DILIP GAIKWAD
Date: 2025.04.16 14:58:57 +05'30'

**( शि.दि.गायकवाड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री (विधि व न्याय) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई
३. प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई
४. प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, नागपूर/ ठाणे/छत्रपती संभाजीनगर
५. प्रबंधक (निरीक्षणे-I), मा. उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
६. पोलीस महासंचालक, मुंबई

७. पोलीस महानिरिक्षक, केंद्रीय गुन्हे अन्वेषण (सी.बी.आय.), मुंबई
८. सह संचालक, केंद्रिय गुन्हे अन्वेषण शाखा (सी.बी.आय.), प्लॉट नं. C-३५A, जी ब्लॉक, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, मुंबई ४०००९८.
९. महालेखापाल- एक (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
१०.महालेखापाल- दोन (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२.निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१३.जिल्हा कोषागार अधिकारी नागपूर/ ठाणे/छत्रपती संभाजीनगर
१४.विधि व न्याय विभाग का. ११, १२, २३,२४ व २५
१५.निवड नस्ती